**जिल्हा रूग्णालय, बीड येथील मुख्य इमारत, मुख्य प्रवेशद्वार, १०० खाटांचा कक्ष, आय.पी.डी. इमारत, जिल्हा शल्य चिकित्सकांचे निवासस्थान व इतर दुरूस्तीच्या कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१४/ प्र.क्र.२२६/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: २० फेब्रुवारी, २०१५.

वाचा

**१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ) यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-६/बांध.बीडदुरू/३-०६०-०६/२०१४, दि.३.११.२०१४.**

**शासन निर्णय**

जिल्हा रूग्णालय, बीड येथील मुख्य इमारत, मुख्य प्रवेशद्वार, १०० खाटांचा कक्ष, आयपीडी इमारत, जिल्हा शल्य चिकित्सकांचे निवासस्थान व आवारातील इतर दुरूस्तीच्या कामांची एकूण रू.८१,०४,४२९/-( अक्षरी रूपये एक्क्याऐंशी लक्ष चार हजार चारशे एकोणतीस फक्त ) किंमतीची १० अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करून देण्याकरीता शासनास सादर केली आहेत. सदर अंदाजपत्रके उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,बीड व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड यांनी प्रमाणित केलेले आहेत सदर अंदाजपत्रकांकरीताचे दर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१४-१५ च्या जिल्हा दरसूचीवर आधारीत असून या एकूण १० अंदाजपत्रकांमध्ये पुढीलप्रमाणे कामांचा समावेश आहे.

| अ. क्र. | कामाचे स्वरूप | कामाची अंदाजित रक्कम रूपये |
|---|---|---|
| १ | जिल्हा रूग्णालय बीड येथील मुख्य प्रवेशद्वाराचे काम करणे ( भाग-१ ) | ९,४३,३३१.०० |
| २ | जिल्हा रूग्णालय बीड येथील मुख्य प्रवेशद्वाराचे काम करणे ( भाग-२ ) | ९,४३,३३१.०० |
| ३ | जिल्हा रूग्णालय बीड येथील पाणीपुरवठा करणे | ४,९९,९१०.०० |
| ४ | जिल्हा रूग्णालय बीड येथील १०० खाटांच्या कक्षाच्या खिडक्या बदलणे (भाग-१) | १०,००,०००.०० |

| अ. क्र. | कामाचे स्वरूप | कामाची अंदाजित रक्कम रूपये |
|---|---|---|
| ५ | जिल्हा रूग्णालय बीड येथील १०० खाटांच्या कक्षाच्या खिडक्या बदलणे (भाग-२) | ९,५०,७५१.०० |
| ६ | जिल्हा रूग्णालय, बीड येथील पश्चिम बाजूस फेन्सिंगचे काम करणे | ५,००,०००.०० |
| ७ | जिल्हा रूग्णालय, बीड येथील आयपीडी इमारतीस रंगरंगोटी करणे ( भाग-१ ) | ८,९९,०६७.०० |
| ८ | जिल्हा रूग्णालय, बीड येथील आयपीडी इमारतीस रंगरंगोटी करणे (भाग-२ ) | ५,१८,०३९.०० |
| ९ | जिल्हा शल्य चिकित्सक,बीड यांचे शासकीय निवासस्थान दुरूस्त करणे (भाग-१ ) | ९,५०,०००.०० |
| १० | जिल्हा शल्य चिकित्सक,बीड यांचे शासकीय निवासस्थान दुरूस्त करणे (भाग-२ ) | ९,००,०००.०० |
| | **एकूण** | **८१,०४,४२९.००** |

उपरोक्त जिल्हा रूग्णालय, बीड येथील मुख्य इमारत, मुख्य प्रवेशद्वार, १०० खाटांचा कक्ष, आयपीडी इमारत व आवारातील इतर दुरूस्तीच्या उक्त अ.क्र. १ ते ८ येथील अंदाजपत्रकांच्या एकूण रूपये ६२,५४,४२९/- (अक्षरी रूपये बासष्ट लक्ष चौपन्न हजार चारशे एकोणतीस फक्त ) इतक्या रक्कमेस तसेच जिल्हा शल्य चिकित्सक, बीड यांचे निवासस्थान दुरूस्तीच्या कामांच्या अ.क्र. ९ व १० येथील २ अंदाजपत्रकांच्या एकूण रू.१८,५०,०००/- ( अक्षरी रूपये अठरा लक्ष पन्नास हजार फक्त ) इतक्या रक्कमेस पुढीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी</u>**

१. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करूनच काम हाती घ्यावे.
२. या कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामाकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
३. उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.१ ते ८ मधील कामे एकाच परिसरातील असल्याने सदर कामांची एक तसेच अ.क्र.९ व १० मधील कामांची एक निविदा काढण्यात यावी.
४. अर्थसंकल्पात निधीची तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास सादर करावा. तसेच अर्थसंकल्पात निधीची तरतूद केल्याशिवाय सदर कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा

**मागणी क्र. एच-८**

४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा ( वैद्यकीय सहाय्य )
११०- रूग्णालये व दवाखाने

(१) (अ )- पंचवार्षीक योजनांतगर्त योजना-इमारती

(००) (०१)- मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ )

५३- मोठी बांधकामे

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१४/इमा-३, दि.२९.१२.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १० येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२०१०३३५०२३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.02.21 11:01:07 +05'30'

**संजय कमलाकर**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, बीड.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.